राज्य शासकीय कर्मचारी गटविमा योजना
१९८२ - विमा छत्र / बचत निधीची संचयी
रक्कम अभिहस्तांकित करण्याबाबत .....

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक: गवियो-११८४/प्र.क्र.१४५/८४/प्रशासन-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ३ मार्च १९८६.

प_रि_प_त्र_क

महाराष्ट्र शासकीय कर्मचारी घरबांधणी अग्रीम नियम, १९६२ अन्वये, शासकीय कर्मचा-याला घर बांधण्याकरीता/घर/सदनिका विकत घेण्याकरीता रु. १,२५,००० किंवा १०० महिन्यांचा पगार यापैकी जे कमी असेल इतके घरबांधणी अग्रिम अनुज्ञेय आहे. घरबांधणीच्या आणि इमारत साधनसामुग्रीच्या खर्चात वाढ झाल्यामुळे अग्रिम देण्या-संबंधीच्या सर्वसाधारण नियमानुसार मिळणारे अनुज्ञेय अग्रिम अपुरे पडते या कारणास्तव कर्मचारी इतर वित्तीय संस्थांकडून अतिरिक्त निधी मिळविण्याचा प्रयत्न करतात, तथापि, अशा संस्था कर्मचा-यांना कर्ज मंजूर करणे शक्य व्हावे याकरीता काही तारण असावे याबाबत आग्रही असतात.

२. राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना, १९८२ अंमलात आल्यानंतर अनेक कर्मचा-यांकडून, विमा छत्र आणि त्यांच्या गटविमा योजनेच्या सदस्यत्वाची बचत निधीमधील संचित रक्कम ही वित्तीय संस्थांकडे अभिहस्तांकित करण्याबाबतच्या विनंतीची बरीच प्रतिवदने शासनास प्राप्त झाली व हा प्रश्न काही कालावधीपासून शासनाच्या विचाराधीन होता.

३. आता काळजीपूर्वक विचार केल्यानंतर शासनाने असा निर्णय घेतला आहे की, विमा छत्र आणि किंवा बचत निधीमधील संचित रक्कम कर्मचा-यांना इमारतीमधील सदनिका/घर संपादन करण्याकरीता त्यांच्या विभाग प्रमुखांच्या विनिर्दिष्ट मंजुरीसह मान्यताप्राप्त वित्तीय संस्थांकडे अभिहस्तांकित करण्यास कर्मचा-यांना परवानगी देण्यात यावी. ज्यात त्याने लेखी विनंतीद्वारे विहित नमुन्यांत [नमुना क्रमांक एक] दिलेल्या अटी व शर्तीनुसार असे उपबंधित केले असावे की, शासनाने मंजूर केलेली घरबांधणी अग्रिमाची एकूण रक्कम व वित्तीय संस्थांकडून घेण्यात येणारे कर्ज या दोन्हींची एकूण रक्कम, विहित केलेल्या कमाल मर्यादेपेक्षा अथवा घराच्या अंदाजित खर्चापेक्षा यापैकी जे कमी असेल त्यापेक्षा अधिक राहणार नाही.

४. विभाग प्रमुखांनी कर्मचा-यांच्या विनंतीची सत्यता विचारात घेऊन त्यांची स्विकृती कर्मचा-यांना विहित नमुन्यात [नमुना क्रमांक-दोन] मध्ये कळवावी. शासकीय कर्मचा-यांची विनंती [नमुना क्र. एक] आणि कळविलेली स्विकृती [नमुना क्र. दोन] संबंधित कर्मचा-याच्या सेवा पुस्तकात चिकटविण्यात यावी. आणि खालील नोंद सुध्दा लाल शाईने त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

"श्री ................................................ यांना त्यांच्या विनंतीप्रमाणे राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना १९८२" अंतर्गत विमा छत्र आणि बचत निधीमधील संचित रक्कम अभिहस्तांकित करण्यास परवानगी दिलेली आहे.
[वित्तीय संस्थेचे नाव ] पहा पत्र दिनांक .......

शा.म.मु. रोटा/वि. वि. /एच -८३८[१०,०००+ -७-३-८६]-१

५. राज्य शासकीय कर्मचारी गटविमा योजना, १९८२ अंतर्गत कर्मचा-यांचा किंवा त्यांच्या वारसांच्या दाव्याची तडजोड करतेवेळेस वित्तीय संस्थेने कर्मचा-याकडून येणे असणा-या कर्जाच्या रकमेबाबत दावा केल्यास कोणतेही तपशिलवार परिनिरीक्षण न करता कर्जाची परतफेड त्यांना करण्यात यावी आणि फक्त उरलेली जी काही रक्कम असेल ती कर्मचा-यांना किंवा त्यांच्या वारसांना देण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि. गो. पाध्ये,
शासनाचे उपसचिव,
वित्त विभाग.

[या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे. ]

सहपत्र:- नमुना एक व दोन.

प्रति,
सर्व विभागीय आयुक्त,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
महालेखापाल, महाराष्ट्र-एक, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-दोन, नागपूर,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवीन मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
महाराष्ट्र राज्यातील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख,
×प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
×प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
×प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
×सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
×सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
मंत्रालयाचे सर्व विभाग,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व उपकोषागार अधिकारी,
उपसंचालक, लेखा व कोषागारे, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग, प्रशासन-५.

×पत्राने.

शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक गवियो ११८४/प्र.क्र.१४५/८४/प्रशासन-५, दिनांक ३ मार्च १९८६ सोबतचे जोडपत्र -

.....

## न मु ना - एक

प्रति

[विभाग प्रमुख]

महोदय,

मी, मेसर्स ------------------------------------------------------ कडून [वित्तीय संस्थेचे नाव] सदनिका/घर बांधण्याच्या/संपादन करण्याच्या उद्देशाने [संपूर्ण तपशील द्यावा] रु. ------------------------------ [अक्षरी आणि आकड्यात] ----------------------------------------- च्या कर्जाकरीता मागणी करीत आहे. मेसर्स --------------------------------------------------------------यांच्या इच्छेनुसार व मला मान्य असल्यामुळे राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना, १९८२ अंतर्गत सदस्यांना मिळणारे विमा छत्र व बचत निधीतील संचित रक्कम मेसर्स ------------------------------------------- कडे अभिहस्तांकित करण्यास मला परवानगी देण्यात यावी.

मला शासन सेवेतून मुक्त करण्यात आल्यास किंवा माझ्या मृत्यूची घटना घडल्यास मला किंवा माझ्या वारसांना मी घेतलेल्या कर्जापोटी असलेली अदत्त बाकी रक्कम मेसर्स -------------------------------------------- यांना अदा करण्यासाठी वापरण्यास मी या पत्राद्वारे आपणास प्राधिकृत करीत आहे व उर्वरीत जी काही रक्कम असेल ती मला/माझ्या वारसांना अदा करण्यात यावी.

मी, मेसर्स ------------------------------------------------------ यांच्या बरोबर केलेल्या करारपत्राची सत्य प्रत अभिलेखात ठेवण्यासाठी थोड्याच अवधीत सादर करीन.

आपला विश्वासू,

[कर्मचा-याचे नाव आणि हुद्दा]

एच-८३८[१०,०००+७-३-८६]-२

नमुना - क्रमांक - दोन

प्रति,

श्री. ----------------------------

महोदय,

आपल्या दिनांक -------------------------- च्या पत्राच्या संदर्भात मला आपणास असे कळविण्याचा आदेश आहे की, घरबांधणीच्या/सदनिका/घर संपादन करण्याच्या [संपूर्ण तपशील द्यावा] उद्देशाने आपण प्राप्त केलेल्या रु. ------------- [अक्षरी व आकड्यात] कर्जास आणि त्याप्रित्यर्थ राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना १९८२ च्या सदस्यत्वाचे विमा छत्र व बचत निधीची संचित रक्कम मेसर्स ------------------------------------------ यांच्याकडे अभिहस्तांकित करण्यास --------------------------------[विभाग प्रमुख] यांची मंजुरी आहे. मेसर्स ---------------------------------------- यांनी आपल्याकडून येणाऱ्या कर्जाच्या देय रकमेच्या दाव्याची मागणी केल्यास तपशिलवार परिनिरीक्षण न करता कर्जाची परतफेड करण्यात येईल. आणि फक्त उर्वरित जी काही बचत निधीतील संचित रक्कम किंवा विमा / छत्राची रक्कम राहील ती आपणास किंवा आपल्या वारसांना प्रदान करण्यात येईल.

२. आपल्या दिनांक -------------------------- च्या पत्राची अधिप्रमाणित प्रत आणि हे पत्र मेसर्स ------------------------------------------यांचेकडे त्यांच्या अभिलेखात ठेवण्यासाठी पाठविण्यात येत आहे.

३. आपण मेसर्स ------------------------------------------ यांच्या बरोबर केलेल्या करारपत्राची सत्य प्रत मिळाली/अजून मिळाली नाही तरी ती तत्काळ सादर करावी.

आपला विश्वासू,

[ ]

एच-८३८[१०,००० ७-३-८६]-३अ.